# "हिज मास्टर्स व्हॉइस"





V.S. GURJAR.

# दीपावली

COPY RIGHT

THE COMBINED MARATHI & NAGRI SUPP

NOVEMBER 1934

# मराठीं सप्लीमेन्ट
# मराठीं आणि हिंदुस्तानी पदांचे
# नवीन रेकॉर्ड

१२ आणि १० इंची दोन्ही बाजूंचे रेकॉर्ड

## MARATHI RECORDS मराठी रेकॉर्ड

**G. N. Joshi B.A. LL.B. जी. एन्. जोशी बी. ए. एल. एल. बी.**

N 5087 ५०८७
- जाहल्या तिन्ही सांजा-घरीं-फुलवात-ए. आर. देशपांडे B.A.LL.B. कवि अनिलकृत
- आकाशींच्या अंतराळीं—अंगाई ,, ,, ,, ,,



श्री. आत्माराम रावजी देशपांडे ( कवि अनिल ) बी. ए. एल्. एल्. बी. सबजज्ज नागपूर, हे महाराष्ट्रांतील एक प्रख्यात तरुण कवि असून आधुनिक महाराष्ट्रीय,

कवींमध्ये त्यांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. 'फुलवात' हा त्यांच्या हृदयस्पर्शी भावगीतांचा संग्रह हल्लींच्या मराठी काव्यग्रंथांमध्यें श्रेष्ठ प्रतीचा समजला जाता. काव्य-विषयासंबंधीं सांगोपांग व सूक्ष्म अभ्यास श्री. देशपांडे यांनीं केला असून "फुलवात"ला जोडलेली त्यांची विस्तृत प्रस्तावना वरील विधानाची साक्ष देत आहे.

कवितेंतील भावना, तिची चाल, त्या भावनेचे वाहक शब्द व त्या शब्दांचा नाद ह्या सर्वांचा अन्योन्यपरिपोषक संबंध असतो, आणि त्यांची जोड कवीच्या आंतरीक वृत्तीला मिळाली म्हणजे निर्माण होणारी कविता, केवळ काव्याच्या वाङ्मय-गुणामुळेंच नव्हे तर संगिताच्याही दृष्टीनें कशी हृदयाला आंदोलनें देते याचें प्रत्यंतर पहावयाचें असल्यास, श्री. देशपांडे यांच्या कवितांकडेच आपणांस धांव घ्यावी लागेल. आधुनिक कवींपैकीं श्री. देशपांड्यांची भावगीतें नावीन्यपूर्ण ठरल्याखेरीज राहणार नाहींत, अशी आमची खात्री आहे. श्री. जोशींसारख्या मधुर गळ्याची जोड ह्या कवितांना लाभल्यामुळें तर त्यांचा ठसा श्रोत्यांच्या मनावर कायमचा उमटेल.

काव्य सूत्रः—"**अंगाई**" (आकाशींच्या अंतराळीं तारकांना तेज चढे) ह्या कवितेंत, स्त्रीच्या निरनिराळ्या अवस्थांतरांत कवीला स्वतःच्या प्रीति भावनेच्या स्थित्यंतरें कशी प्रतिबिंबित झालेलीं दिसतात तें अत्यंत नाजुक रीतीनें दाखविलें आहे. भावनेचा मूळ नाजुकपणा कवितेच्या चालीपासून तों शब्द, उपमा, इत्यादिकांमधून ही एकतानतेनें कायम ठेवल्याकारणानें ही कविता हृदयाचा खोल ठाव घेते. आणि ती संपल्यानंतर ही श्रोत्याचें हृदय त्याच नादांत गुंगत राहतें. 'घरीं' (जाहल्या तिन्ही सांजा) ह्या कवितेंत, आपल्या वाटेकडे डोळे लावून बसलेल्या 'कोणातरी" व्यक्तीच्या अनुरागीमुळें मनाला लागलेल्या ओढीचें वर्णन अत्यंत



रसानुकूल रीतीनें केलेलें असून कवितेची चाल त्यांतील भावनांना सर्वस्वी अनुकूल व रसपरिपोषक अशीच आहे. ह्या दोन कविता ऐकून, भावगीत आणि संगीत हे दोन भिन्न विषय नसून त्यांचा परस्परांशीं अत्यंत जवळचा व जिव्हाळ्याचा संबंध आहे, हें श्रोत्यांच्या निदर्शनास येईल.

एक बाजूः— आकाशींच्या अंतराळीं............इत्यादि

दुसरी बाजू;— जाहल्या तिन्ही सांजा............इत्यादि

( कवितांचें आम्ही निराळें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. )

**MEHBUBJAN Of SHOLAPUR** **मेहबुबजान, सोलापूर.**

N 5088 / ५०८८
- हास हास हास बाळे— के. जी. दिक्षीत उर्फ कवि कुमार संजीवकृत
- इशा तोडि पाशा—कर्नाटकी पी. आर. भोपे—मधुकर मेळा, पुणें-कृत

आमच्या ग्राहकांना सुपरिचित असलेल्या सोलापुरच्या सुप्रसिद्ध गायिका **मेहबुबजान** यांचा रेकॉर्ड या महिन्याला प्रसिद्ध करतांना आम्हांला विशेष आनंद होत आहे. कारण असें कीं या कंठमधुर गायिकेचा पूर्वीचा रेकॉर्ड प्रसिद्ध झाल्यास बराच कालावधि लोटल्यामुळें त्यांचा नवीन रेकॉर्ड केव्हां एकदां प्रसिद्ध होत आहे इकडे रसिकांचें लक्ष वेधून राहिलें होतें. आणि या रसिकांची इच्छा तृप्त करण्याचा योग या महिन्यास आल्यामुळें आम्हाला आनंद होणें साहजिकच आहे.

आजकाल अर्थविहीन गाण्यांपेक्षां अर्थसौंदर्यानें विभूषित झालेल्या कवितांचे रेकॉर्डस जास्त वाखाणले जात आहेत. लोकांची ही बदलती अभिरुचि लक्षांत घेऊन लोकप्रिय कवि **कुमार** संजीव आणि श्री. **भोपे** यांनीं रचिलेलीं दोन भावगीतें या

---

गल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



रेकॉर्डवर मेहबुबजान यांनीं गायिलीं आहेत. भावगीतांना संगिताचें वावडें मुळींच नाहीं ही गोष्ट आतां पुष्कळांना पटत चालली आहे. मेहबुबजान यांची मधुर चालीनीं नटलेली ही भावगीतें ऐकल्यावर भावगीत-संगीताचा मिलाफ किती गोड होऊं शकतो याची प्रचीति तुम्हांला मिळेल.

एक बाजू:— हास हास हास बाळे, हास हास हास ॥
हीच वेळ हासायाची, सौख्यसुधा सेवायाची
जोंवरी न जाणिलें तूं, मतलबी जगास—
अंग अनंगानें न फुलें, हृदय प्रेमवाणी न बोले
जोंवरी विकार नसती, कोंवळ्या मनास—
संसृतीचा पंजर तुजला, अजून नाहीं कोंडायाला
तोंवरी तुला फिराया, मोकळें आकाश-बाळे,

दुसरी बाजू:— ईशा तोडी पाशा । सोडवी मायभू आतां ॥
तुजवीण जगीं नाहीं अतां ॥ सोडवाल
यांतुन ऐसा कोणां आळवुं आतां ॥ १ ॥

## Krishnabai Ramdurgkar — कृष्णाबाई रामदुर्गकर

| | | |
|---|---|---|
| N 5089 | सजणा धरिं जाया रे मन भ्यालें-गझल | मामा वरेरकरकृत |
| ५०८९ | आण भाक करि प्रेम दाविता ,, | ,, ,, ,, |

**कृष्णाबाई रामदुर्गकर** यांचा पहिला रेकॉर्ड गेल्या महिन्यांत आम्ही प्रसिद्ध केला व त्याचें जनतेकडून जें स्वागत झालें त्यानें हुरूप येऊन आम्ही या महिन्यांत त्यांचा दुसरा रेकॉर्ड ग्राहकांना सादर करीत आहों. ग्रामोफोन-जगतांत प्रसिद्धि मिळविण्याकरितां जरूर असलेले सर्व गुण, कृष्णाबाईंच्या अंगी वसत



आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्तिचा दोष आमच्या पदरीं येईल असें आम्हांस वाटत नाहीं. रेकॉर्डींगला अत्यंत अनुकुल असा आवाज, गायनशास्त्राची उत्तम माहिती, जनतेच्या आवडीचा वारा कोणत्या दिशेनें वाहतो आहे. हे अचुक जाणून त्याप्रमाणें रेकॉर्ड देण्याची कला, या गुणसमुच्चयाच्या जोरावर थोडक्याच काळांत कृष्णाबाई आपलें नांव लोकांच्या तोंडी खेळवितील, अशी आमची खात्री आहे.

या महिन्याला त्यांनीं मामा वरेरकृत दोन गझल गायिले आहेत. आपण नेहमीं ऐकतों त्यापेक्षां कांहींतरी निराळी व नाविन्यपूर्ण गोडी या गझलामध्यें तुम्हाला अनुभविण्यास मिळेल असें आम्हीं निःशंकपणें म्हणतों. मामा वरेरकरांसारख्या पदें रचण्याचा कित्येक वर्षांचा अनुभव असलेल्या नाटककाराच्या लेखणींतून हे गझल उतरले आहेत, ही एकच गोष्ट या रेकॉर्डची शिफारस करण्यास पुरेशी नाहीं काय ?

एक बाजूः-- सजणा धरिं जायां रे मन म्यालें ॥ धृ० ॥

प्रीती खुळी मना गमे प्राणासी चाळवी ।
सजलें जिवाया रिझाया रे मन म्यालें ॥ १ ॥

मीं टाकिलें घराला तुजसाठीं आपुल्या ।
तुझिया पदींया रमाया रे मन म्यालें ॥ २ ॥

दुसरी बाजूः— आणभाक करि प्रेम दावितां ।
अतुल सुख परा अबला दयिता ॥ धृ० ॥

प्रणय परता जाळि हृदया । तरल पुरुषा वाटे वांया !
सरळ मनाचा, न मिळे दाता ॥ १ ॥

---

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डस्चे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



**Kumari Malini Telang** **कुमारी मालिनी तेलंग**

N 5090 { झुलति डुलति लतिका—बागेश्री मामा वरेरकरकृत
५०९० { छबड्या मुला गुणी तान्हुल्या-कर्नाटकी ,,

ह्या रेकॉर्ड ऐकल्यावर तो अवघ्या दहा वर्षांच्या मुलीनें दिला आहे हें तुम्हाला सांगितलें तर खरें देखिल वाटणार नाहीं. वयाच्या मानानें या बालगायिकेनें संगीत कलेमध्यें मिळविलेलें प्राविण्य कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ? कु. मालिनी तेलंग ही येथील सुप्रसिद्ध श्री. डॉक्टर वामन दत्ताराम तेलंग एम्. बी. बी.एस, यांची कन्या. मुंबईचे विख्यात पेटीवादनकार व संगीतज्ञ प्रो. विठ्ठलराव प यांनीं या मुलीला शिक्षण दिलें असून त्या मुलीच्या अल्पकाळांत झालेल्या या प्रशंसनीय प्रगतीचें सर्व श्रेय सर्वस्वी त्यांनाच आहे.

या तिच्या पहिल्या रेकॉर्डवर तिनें बागेश्री व कर्नाटकी रागांतील दोन गाणीं गायिली असून तीं श्री. मामा वरेरकर यांच्या कसलेल्या लेखणींतून बाहेर पडली आहेत. एका अल्पवयी मुलीचा ह्या रेकॉर्ड आहे, म्हणून केवळ कौतुक करण्या-इतकेंच या रेकॉर्डचें महत्व नाहीं तर गोड गायनाचा एक उत्तम नमुना या दृष्टीनें संग्राह्य करण्यासारखा ह्या रेकॉर्ड आहे.

एक बाजूः— झुलति डुलति लतिका । वनभार्गी ।
वायुगामि विटपा विशाला । कवटाळिति या प्रेमशलाका ॥ध्रु०॥
कुंजागणिच्या वेणुरवाने । लाविति वाटे प्रेम पताका ॥१॥

दुसरी बांजूः—छबडया मुला । गुणि तान्हुल्या ॥
किती वानिला । आतां तुला ॥ध्रु०॥
झणि बाळ आला । लपला पळाला ।




या सप्लीमेंटमधील व आमच्या मेन कॅटलॉगमधील रेकॉर्डस् मिळून आमच्या रेकॉर्डसूचें संपूर्ण लिस्ट होतें.

नाच नाचे । फसवी मला
किती वानिला आतां तुला

## DADA KOTHIWAN OF NAGPUR

दादा कोठीवान, नागपूर

N 5091 { गीता प्रवचन — नकल
५०९१ { आधुनिक कर्मकाण्ड — ,,

दादा कोठीवान यांची ओळख का करून देण्याची गरज आहे? त्यांचा 'टांगेवाला' अद्यापी सर्वत्र गरजतो आहे. नकल यथायोग्य वठविण्यांत दादांचा हात धरणारा कोणी असेल असें आम्हांस वाटत नाहीं. आतापर्यंत प्रत्यक्ष अगर रेकॉर्डवर तुम्ही पुष्कळ नकला ऐकल्या असतील. सर्व साधारणपणें पाहिल्यास या नकला एकच पद्धतीच्या, पुष्कळदा हाताळलेल्या विषयांच्या असतात. दादाच्या नकलांचे वैशिष्ट्य हेंच कीं त्यांनीं निवडलेले विषय हाताळलेले–उष्टे नसतात. दादांना मिळालेल्या यशाचे कारण हेंच होय.

आणि दादांच्या या नवीन रेकॉर्डमध्यें देखिल हें वैशिष्ट्य कायम असल्याचें तुम्हांला आढळून येईल. प्रवचन सांगणाऱ्या भटजींची नक्कल करतांना त्यांनीं नेहमीच्या प्रवचनाची नक्कल न करतां निराळेंच प्रवचन निवडलें आहे. तीच गोष्ट आधुनिक **कर्मकाण्डाची**. भगवन्तानीं अर्जुनाला युद्धभूमिवर सांगितलेली गीता उदात्त उपदेशानें, उज्वल नीतितत्वानी व विचारप्रवर्तक श्लोकांनी भूषिलेली आहे ती वाचतांना मनुष्याच्या चित्तवृत्ति गंभीर होतात; पण दादांची ही गीता ऐकतांना श्रोता सारखा हंसत सुटतो. संसाराच्या दगदगीनें त्रासलेल्या जीवाला आराम देण्यास हा रेकॉर्ड म्हणजे रामबाण औषध–छेः औषध हा शब्द या

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



आनंददायक रेकॉर्डचें वर्णन करतेवेळीं कसासाच वाटतो, नाहीं ?—हा रेकॉर्ड दगदगलेल्या जीवाला उत्साह देणारी संजीवनी आहे.

एक बाजू:— गीताप्रवचन.........

दुसरी बाजू: —आधुनिक कर्मकाण्ड.........

## Hindustani Records हिंदुस्तानी रेकॉर्ड

### Mallikarjun Mansur मल्लिकार्जुन मन्सूर

| | | | |
|---|---|---|---|
| HT | 33 | बीन बीन बजाये माइली | तोडी |
| | ३३ | चतुर सुगरा आवोजी | दुर्गा |

गेल्या गणेशोत्सवांत मुंबईमध्यें एकच नांव ज्याच्या त्याच्या तोंडी खेळत होतें. दहा दिवसाच्या या गणेशोत्सवामध्यें मंडळी रात्रीच्या वेळीं कार्यक्रम पहाण्याकरितां अन् ऐकण्याकरिता बाहेर पडली कीं या नांवाचा उल्लेख संभाषणांत जरूर यावयाचाच. संबंध मुंबईला आपल्या संबंधाने बोलण्यास लावणारी ही व्यक्ति म्हणजे **मल्लिकार्जुन मन्सुर** होय. त्यांच्या गायनाच्या कार्यक्रमांना होणारी तोबा गर्दी त्यांच्या लोकप्रियतेचें व यशस्वितेचें 'चालतें बोलतें' प्रतीक होतें.

या महिन्याला, बारा इंची रेकॉर्डवर त्यानीं 'तोडी' व दुर्गा रागांतील दोन चीजा गायिल्या आहेत. मंद लयींतील तोडी रागांतील 'बीन बीन बजाये माइली' या गाण्याला योग्य रितिनें 'बॅलन्स' करण्यासाठीं मुद्दाम दुर्गा रागामध्यें त्यांनीं



'चतुर सुगरा' ही चीज किंचित जलद लयीमध्यें गायिली आहे. कर्नाटकी संगीत पद्धतीची थोडीशी झांक मल्लिकार्जुनांच्या प्रत्येक गाण्यावर पडत असल्यामुळें त्यांच्या गायनाला गाण्याची विशेष गोडी येते. शास्त्रशुद्ध संगीत आवडणाऱ्या रसिकांना हा रेकार्ड म्हणजे उच्च गायनाची मेजवानीच वाटेल.

एक बाजू:— बीन बजाये माइली ॥ गायेली कीतान्न अब हे
बाबू कछु खा ॥ मद पिये मतुवन । कलस और कलास
छीन बजावे ॥१॥

दुसरी बाजू:—चतुर सुगरा आवोजी । बाल मुवा लेहूं।कन्हैया ॥ध्रु०॥
बहुत दिननमो । मिलन भइलवा काहे अब तोरा रे ॥१॥

| | | |
|---|---|---|
| N 5710 ५७१० | सोहि रसना जो | भीमपलास–झपताल |
| | हरनाम सुमर सुखधाम | भजन–मिश्र कॉफी |

**Prof. NARAYANRAO VYAS — प्रो. नारायणराव व्यास**

| | | |
|---|---|---|
| N 5725 ५७२५ | भज रघुवीर शाम जुगल चरना | बहार |
| | तुम जागो मोहन प्यारे | भैरव |

यांच्यासंबंधी रसिकांना माहित नसलेलें असें आम्ही काय सांगणार? या महिन्याच्या रेकार्डवर त्यांनीं बहार व 'भैरव' या रागांची निवड केली आहे. सफाईदार वैचित्र्यपूर्ण ताना हें प्रोफेसर साहेबांच्या गायकीचें वैशिष्ट्य या रेकॉर्डमध्येंही विशेषतः बहार रागांतील चीज गातांना दिसून येतें. चीजांचा अर्थ सोपा, सर्वांना सहज समजेल असा असल्यामुळें या गाण्याच्या आकर्षकतेमध्यें भर पडली आहे. रसिकांनी "हा रेकार्ड अवश्य संग्रही ठेवावा" ही पुस्ती जोडण्याची

---

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचें लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



मुळींच जरूरी नाहीं असें आम्हाला वाटतें, कारण आमच्या शिफारसीच्या अभावींही हा रेकॉर्ड गायनाचा प्रत्येक शोकीन घेतल्याखेरीज खास राहणार नाहीं.

एक बाजू--भज रघुवीर शाम जुगल चरना ॥
इतहि अयोध्या निर्मल शरयू । उत गोकुल जमुना ॥
इत कौशल्या गोध खिलावे । उत जशोदा हिलो वे पलना ॥
इत बाहिपर सीय बिराजे । उत राधासंग रमना ॥
इत तुलसी उत सूर बिराजे । जुगलचरन चित धरना ॥

दुसरी बाजूः--तुम जागो मोहन प्यारे ॥
सांवली सुरत मोहे मनही भावे सुंदर शाम हमारे ॥
प्रात समय उठी, भानु उदय भये, ग्वाल बाल सब भूपति,
तुम्हारे दरसको काज ठाडे, उठि उठि नन्द किशोरे ॥

| | | | |
|---|---|---|---|
| HT | 26 / २६ | बनठन काज चले ऐसी को | केदार–ख्याल |
| | | तुम सुघर चतुर भैंया | केदार–द्रुत एकताल |
| N | 5721 / ५७२१ | अब नो कब हूं कर जानि हो | बिहाग |
| | | जमुनातट शाम खेले होरी | बिंद्राबनी सारंग |

## Sawai Gandharva — सवाई गंधर्व

| | | | |
|---|---|---|---|
| N | 5726 / ५७२६ | बादरवा बरसन लागी | सूरदासी मल्हार |
| | | किशोरी केवल बल मोहितो | मांड–केरवा |

गेल्या महिन्यांत आम्हीं सवाई गंधर्वाचा ' झननन झननन बाजे ' व ' भाई वे तोरी' या चीजा असलेला रेकॉर्ड प्रसिद्ध केला आणि अल्पावधींत



त्याचा सर्वत्र बोलबाला झाला. कोणीही मनुष्य एखाद्या विशिष्ट प्रांतामध्यें यशस्वी झाला म्हणजे साहजिक आपण विचार करीत असतों कीं, या मनुष्याच्या यशाची गुरुकिल्ली कोणती ? सवाई गंधर्वांनीं संगीतकलेमध्यें जें असामान्य नैपुण्य मिळविले तें कोणत्या गुणांवर ? या प्रश्नाचें उत्तर या महिन्याच्या त्यांच्या ' सूरदासी मल्हार ' व ' मांड ' रागांतील चीजा ऐकल्यावर तुम्हास मिळेल. गायन कलेमध्यें कौशल्य प्राप्त होण्यास त्यांनीं किती अविश्रांत परिश्रम केले असले पाहिजेत, केवढी चिकाटी त्यांच्या अंगा असली पाहिजे हें हा रेकॉर्ड ऐकतांना तुमच्या लक्षांत येईल.

" बादरवा बरसन " ही चीज सूरदासी मल्हार रागांतील आहे. आधींच हा राग गोड व त्यांत सवाई गंधर्वासारखा पट्टीच्या गायकाने तो गायिलेला मग 'दुधांत साखर' ही म्हण कोणाला आठवणार नाहीं ? दुसऱ्या बाजूवर 'मांड' रागांतील ' किशोरी केवल बल मोहितो ' ही मांड रागांतील अत्यंत मधुर चीज त्यांनीं गायिली आहे. रेकॉर्डच्या गुणांकडे पाहतां या रेकॉर्डवर लोकांच्या उड्या पडतील अशी आम्ही अपेक्षा केली तर त्यांत गैरवाजवी असे काय आहे ?

एक बाजू:—बादरवा बरसन लागी ।
ननन बूंदन, गरज गरज चहूं ओर बिजली चमकत ॥ ध्रु० ॥
कोयलिया कूक सुनत हूक उठत छतिया धरत
कलन परत पिया बिन पपिया पिया पिया पिया करत ॥ १ ॥

दुसरी बाजू:—किशोरी केवल बल मोहीतो । नहीं स्वर्ग अपवर्गहि देखो ।
पननख जोति निरंतर लेखो जैसे चंद्र किशोर ॥ १ ॥

| | | |
|---|---|---|
| N 5720 | झननन झननन बाजे पायलिया | देसकार—त्रिताल |
| ५७२० | भाई वे तोरी साहेरा | भैरवी—दीपचंदी |




**गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचें लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.**

N 5713 काहे राजा मानत जियारा हमारा — धानी
५७१३ लाल जिनकर हो — हिंदोल

## K. H. Wakankar of Bhor — के. एच. वाकणकर, भोर

N 5727 कैशी वशी जाऊं सैंयां मैं. — पहाडी कवाली
५७२७ काहे मारा नजरिया — भैरवी त्रिताल

आमच्या नवीन उदयोन्मुख गायकांमध्यें भोर संस्थानचे दरबारी गवई श्री. वाकणकर यांचा नंबर बराच वर लागेल. गोड आवाज, कर्ण मधुर चाली व कुशल गायक इतका संच जमल्यावर रेकॉर्ड 'हां' 'हा' म्हणतों खपून गेला तर त्यांत आश्चर्य तें काय ? श्री. वाकणकर हे कुशल गायक आहेत, त्यांनीं या रेकॉर्ड करितां निवडलेल्या चाली मधुर आहेत, त्यांचा आवाज अत्यंत सुस्वर आहे. या महिन्याच्या रेकॉर्डवर त्यांनीं 'पहाडी' व भैरवी या रागांतील गाणी गायिलीं असून केवळ शब्दांनीं त्यांची योग्य कल्पना आणून देणें शक्य नसल्यामुळें हा रेकॉर्ड तुम्हीं एकवार ऐका अशी आमची तुम्हाला शिफारस आहे.

एक बजूः—कैशी कैशी जाऊं सैंया मैं,
छिन ले गयो मेरा दिल ॥ ध्रु० ॥
तलफे तलफे सारी, निंद नहीं आयी
सैया बिन ना पडे चैन ॥ १ ॥

दुसरी बाजूः—काहे मारा नजरिया,
आजा सांवरिया गरवा लगावो ॥ ध्रु० ॥
जादुकी पुडिया पडकन लागे,
क्या करे विचारा ॥ १ ॥




या सप्लीमेंटमधील व आमच्या मेन कॅटलॉगमधील रेकॉर्डस मिळून आमच्या रेकॉर्डसचें संपूर्ण लिस्ट होतें.

N 5714 { चालो चालो गोकुलमां — मिश्र मालगुंजी
५७१४ { काना मुखसे न बोलो — मिश्र पिलू

## Bai Laxmibai of Baroda — बाई लक्ष्मीबाई (बडोदा)

N 5728 { मिल जा मुझे पियारे — गझल
५७२८ { उधो वा सांवरी सुरत — ,,

बाई लक्ष्मीबाई यांनीं या महिन्याला ठरीव चाकोरीमधून बाहेर पडून अगदीं निराळ्या व नावीन्यपूर्ण पद्धतीचा रेकॉर्ड दिला आहे. आतांपर्यंत बाईनी खानदानी चीजांचे व संगीत पद्धतीच्या पदांचे बरेच रेकॉर्डस दिले आहेत; पण या वेळीं त्यांनीं या रेकॉर्डसाठीं दोन गझलांची निवड केली आहे.

गझलांची लोकप्रियता किती दांडगी आहे हें आमच्या ग्राहकांना तरी सांगण्याची गरज नाहीं. नुकताच कोठें 'आ' करूं लागलेला संगीताचा नवशिका अभ्यासू व संगीतशास्त्रावर विलक्षण प्रभुत्व असलेला गायक दोघेही गझल गातात खरे पण त्यामध्यें फरक केवढा ! हा फरक बरोबर लक्षांत येण्यासाठीं गायनचंद्रिका लक्ष्मीबाईचा हा रेकॉर्ड तुम्हाला ऐकलाच पाहिजे.

एक बाजूः—मिल जा मुझे पियारे, क्यौं देरिया लगाई ॥
जलवा दिखाके अपना, किस ज्यां गये छीपाई ॥
बिरहेकी आग भारी, तनमन दिया है जारी ॥
तुमरी छबी पियारी, मनमें रही समाई ॥
कर प्रेमका इषारा, दिल ले लिया हमारा ॥
अब क्यौं मुझे बिसारा सुरत नहीं दिखाई ॥

---

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचें लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



दुसरी बाजूः--उधो वो सांवरी सुरत हमारे नैनका तारा ॥ ध्रु० ॥
अगर हम जानती मोहन, चले जायेंगे गोकुल से ॥
लगाती प्रेमना ना उनसे, छोड घरकाज हमारा ॥
तुम्हारी ज्ञानके बाते, असर करती नहीं दिलपे ॥
बसा है कृष्ण हिरदेमें, नहीं होता कबी न्यारा ॥

| | | |
|---|---|---|
| N 5723 ५७२३ | बरकतवा लियो ठाडो | काफी |
| | खेलन ना जाऊं | देस |
| N 5715 ५७१५ | नेवर बाजो रे | कामोद |
| | बसंतकी धूममची | बहार |

## Instrumental Records — वाजींत्र रेकॉर्ड

### SHANKARRAO GAIKAWAD — शंकरराव गायकवाड

| | | |
|---|---|---|
| HT 34 | सनई गत-पंचकल्याणी घोडा | लावणी ( चौघडा ) |
| | ,, ,,-पाऊस पडला | ,, ,, |

शंकरराव गायकवाड यांनीं यावेळीं दोन लावण्या आपल्या कर्णमधुर सनईवर अत्यंत कुशलतेनें वाजविल्या आहेत. रागदारीच्या चीजांचे सूर सनईमधून काढण्यामध्य शंकरराव जितके पटाइत आहेत तितकाच लावण्यांसारख्या गायन प्रकारामध्यें त्यांचा हातखंडा आहे आणि याची प्रचिती हा रेकॉर्ड ऐकल्यावर तुम्हाला येईल. शंकररावांचे चहाते हा रेकॉर्ड संग्रहीं ठेवतीलच पण अद्यापी ज्यानीं त्यांची सनई



या सप्लीमेंटमधील व आमच्या मेन कॅटलॉगमधील रेकॉर्डस् मिळुन आमच्या रेकॉर्डसचें संपूर्ण लिस्ट होतें.

वरील करामत पाहिली–किंबहुना ऐकली नसेल त्यांना देखिल हा रेकॉर्ड एकदा ऐकल्यावर संग्रही ठेवण्याचा मोह होईलच होईल.

एक बाजूः– पंचकल्याणी घोडा अबलख......इत्यादि

दुसरी बाजूः– पाऊस पडला गुलाब फुलला......इत्यादि

| | | | |
|---|---|---|---|
| HT | 31 | सनई गत–कृष्णमुरारी बिनती | धानी |
| | ३१ | ,, –कोन गत भई | बागेश्री |

## GUJRATI RECORD गुजराती रेकॉर्ड

Kumari Shamala कुमारी शामला

Swami Samarth G. V. Vidyalaya

(स्वामी समर्थ गायन वादन विद्यालय)

| | | | |
|---|---|---|---|
| N | 5424 | लाले मेरा धन थई शुं हुं राणाजी | मांड जोगीया |
| | ५४२४ | चरणे हुं नित्य नमुं रे | भीमपलास |

स्वामी समर्थ गायन वादन विद्यालयाच्या प्रिन्सिपाल कु. शामला माजगांवकर यांनी या वेळीं गुजराती गाणीं गायिलीं असून, भाषेमुळें व गोड गायनामुळें गुजराथी श्रोत्यामध्यें हा रेकार्ड लोकप्रिय होईलच पण शिवाय महाराष्ट्रीय जनतेमध्यें गायिकेनें मिळविलेली लोकप्रियता पाहतां हीं गाणीं महाराष्ट्रीय घरामधूनहीं ऐकू येतील अशी आमची खात्री आहे.

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



एक बाजूः—लाले मेरा धन थई शुं हुं राणाजी हुं तो ॥ ध्रु० ॥
सोनाना थालमां हमे नहीं जमशुं राणा
तुमडी पत्तलनां हमे जमशुं हु राणाजी हुं तो
बाई मीरा कहे छे प्रभु गिरिधरना गुणवाला
प्रभुनुं नाम हमे तो लई शुं राणाजी ॥

दुसरी बाजूः--चरणे हुं नित्य नमुं रे नाथ तारे
जगन्नाथ, जगत्तांत प्रभु तारे ॥ ध्रु० ॥
सत्य सबल सर्वांतरयामी,
नित्य निरंजन प्रभु निष्कामी,
करुणामय मंगलमूर्ती सदा,
तारूं स्मरण करूं रे नाथ तारे ॥ १ ॥





# जुना पण उल्लेखनीय रेकॉर्ड

HT 59 { ड्रामा हरीजन भक्त रईदास भा. १
५९ { ,, ,, ,, ,, ,, २

हरीजनभक्त रईदासाची कथा पुष्कळांना माहित आहे. दलित वर्गाचा उद्धार करण्यांत त्यानें आपलें सर्व आयुष्य खर्च केलें. त्याच्या या वागणुकीमुळें पुरोहित मंडळी व इतर कट्टर धर्माभिमानी मंडळी त्याच्यावर अत्यंत संतापली होती. रई–दासाच्या जीवनाचें सार या रेकॉर्डमध्यें अत्यंत परिणामक रितीनें आणलें आहे. सुटसुटीत संवाद व गाणीं यामुळें आपण नाटकगृहामध्यें आहों असा भास उत्पन्न होतों. संवाद तर इतके स्वाभाविक झाले आहेत कीं त्यांचा मनावर झालेला परिणाम चिरकाल टिकून रहातो. गाण्यांचे रेकार्डस नेहमीं नेहमीं ऐकून कांहीतरी नाविन्यपूर्ण पाहिजे असें वाटणाऱ्या ग्राहकानें हा रेकॉर्ड अवश्य खरेदी करावा अशी आमची शिफारस आहे.

एक बाजू:—( भक्त रईदास हर भक्ति में लीन है हरीकीर्तन की ध्वनि आकाशमें गुंज रही है. )

गाना

पीत लगाई जिसने हर से पार हुआ भवसागर से पीत लगाई
करले करले जाप हरी का दान भी करले कुछ कर से पीत लगाई
आ वागवन के बन्ध कटेंगे लखे चौरासी फन्द कटेंगे
छुट जायेगा कट घर से पीत लगाई......

शियामा— स्वामी तुहे किया हो गया जब हरीकीर्तन जब देखो जब हरी भजन पियारे हममें बरहमन के घरमें नहीं बलके चमार के घरमें जनम लिया है.

गल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डसूचे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिले आहे.



रईदास– पियारी छोटा बडा उजला मैला केवल इस संसार में देखा जाता हैं जगत पिता के दरबार में तो प्रेम और केवल प्रेम सनमान पाता है.

नहीं छोटा बडा कोई जगत स्वामी की चोखट पर
कि राजा रंक दोनो की गती है एक मरघट पर

शयमा– बस बस अब इस वियाख्यान को रहने दो शेट लोभी लाल के जूते अभी तक तइयार नहीं हुये पिता जी आज बौहुत नाराज हो रहे थे.

रईदास– लोभी लाल का एक जोडा रहा है वह भी आजकाल में तइयार हो जायेगा.

( साधू के बेस में भगवान कृष्ण आते हे शंख की ध्वनि आकाश गुंजती है. )

साधु– अलख अलख दाता के भंडार भर रहे ( कांटा चुभने से गिर जाते है. ) हाये.

ईदास– क्या हुआ प्रभु क्या हुआ.

साधु– कुछ नहीं नाग फनी का कांटा पाओं में चुभ गया.

रईदास– लीजये यह जोडा पहन लिजिये.

हरीजन संत सेवा को जानो माल हाजिर है
तुम्हारे पाओं की जुते को मेरी खाल हाजिर है

पिता– ( आहर ) रईदास रईदास दो हफते से तू ने कुछ भी काम नहीं किया सिरफ लोभी लाल का एक जुता बनाया वह भी इस साधु को दे दिया. जा निकम्मे मेरे घर से निकल जा.

रईदास– क्षमा पिताजी क्षमा.

पिता– जा जा मुझे अपनी सुरत ना दिखा जा मेरे पीछे पीछे ना आ

---

रईदास- अच्छा तुमने मुझे छोड दिया तुमहारी इच्छा.
छुटा जब एक घर तो विशव भर को घर बनाउंगा
पिता को छोड कर जग के पिता से लो लगाउंगा

गाना

मार्टी काया माटी माया माइ सब संसार रे
सुपने में सुख कां साज बजाया आंख खुली जब कुछ भी न पाया
झुटी समपत झुटी दौलत झुटा जग विवहार रे
अन्त समेय कोई काम ना आवे पन्छी अकेला जायगा
झुटा तन मन झुटा जीवन सच्चा सरजन हार रे

साधु- रईदास मांग क्या मांगता है,

रईदास- त्रिभुवन पति. मै आय भर सदा करता हुं गुन गान भगती का
जो देना कुछ मुझे चाहो तो बरदान भगती का

साधु- तथास्तु सुत ( पटाखे की आवाज पर लोप हो जाते है )

दुसरी बाजूः—

प्रोहित- अय दाता की जय हो महाराज आप के राम राजय मे अन्धेर हो रहा है रइदास चमार मंदीर में जाता हैं देव मुरतीको अपवित्र करके धरम की मरयादा को बट्टा लगाता है देखये वही सामने गाता हुआ आ रहा है.

गाना

मेरा मनमोहन मतवारा मुझे प्रानो से है पियारा

---





भेद ना पाया वेद ने तेरा सुरनर मुनी मन हार मन
मेरा............
प्राण की जोती तेज तिहारा नैनों का उजारा मेरा मन

राना— तुझें देव मंदिर में जाने का अधिकार किस ने दिया

रईदास— पिता के पास जाने का अधिकार पुत्र को कौन देता है

जगत स्वामी है वह जगदीश्वर है सबके रक्षक है
पिता है सब के वह छोटे सब उनके बालक हैं

प्रोहित— महाराज देखये यह कुत्ता अपनी जात भी नहीं पहचान्ता खुद ब्राहमनों के समान जानता है.

राना— अच्छा रईदास देखो यहां सिहांसन पर यह जो देव मूरती बराजमान है यह प्रोहित जी भी उसे बुलाते है तुम भी बुलाओ देखो भगवत किसके पास जाते हैं.

प्रोहित— महाराज नीराकार भगवान कीस तरह हमारे पास आ सकते है.

रईदास— आ सकते है अगर चाहे तो अभी भकतीका चमत्कार दीखा सकते है.

है अटल वीशवास मुझको नंद के गोपाल पर
रीझ जायेंगे वह मेरी झांझ पर खडताल पर

प्रोहीत— शेखी बघारता है झक मारता है

राना— अच्छा रईदास तुम प्रभु को अपने पास बुलाओ

रईदास— हे कृष्ण मुरारी गीरीधारी हे दीन दयाल मुरलीधर
हे देवकी नन्दन बनवारी हे श्याम बिहारी नटनागर

अब डूबती हैं भव सागर में यह नाओ हमारे जीवन की
अब कौन खेवईया है तुम बिन जब टूट गयो या कर लगर

प्रोहित– [ मजाक के लहजे में ] देख देख वह आ गये गरुडगामी वह आगये अनेतरयामीं ( हाह )

रईदास– पिता आजमो दरशनों को क्यों तडपा रहे हो भरी सभा में मेरी हंसी उठाय रहे हो.

दया का आंसरा लेकर तुम्हें मै ने बुलाया है,
पिता आजाओ संकट तुम्हारा पुत्र आया है.

गाना

आओ पिता अब देर कहांकी निरखे मनवा तुमरी झांकीं
भगत जनों के तुम हो स्वामी भूल न जाना अन्तरयामी
आओ पिता

आओ आओ श्याम बिहारीं दरस का तुमरे दास भिकारीं
( एकदम आवाजथी भगवान् प्रगट थाय छे )

भगवान– नां घबरा रुईदास ना घबरा मैं आ गया

जो मेरे दास है हर दम मैं उनके पास रहता है,
जो मुझसे प्रेम करते है मैं उनके पास रहेता हैं,

रईदास– बोलो श्रीकृष्ण महाराज की जय

**Harindra Nath Chatopadhyaya**

**हरिन्द्रनाथ चटोपाध्याय**

N 7300 { तुम्हारा कारण सब सुख छोडिया
७३०० { मेरे जनम मरण के साथी

---





पूरणभक्त बोलपटामुळें ज्यांची कीर्ति आज अखिल भारतखंडांत दुमदुमत आहे त्या **कृष्णचंद्र डे** यांना, बंगाली गायन पद्धति लोकप्रिय केल्याचें श्रेय दिलें पाहिजे. एन ६२६७ या त्यांच्या रेकॉर्डचा बोलबाला जितका झाला तितका दुसऱ्या कोणत्या रेकॉर्डचा झाला असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. आज या रेकॉर्डची आठवण होण्याचें कारण **श्री डे** यांच्यावरील रेकॉर्डचें स्मरण करून देणारा एक अत्युत्कृष्ट रेकॉर्ड आम्हीं प्रसिद्ध करीत आहों. कलकत्त्याचे प्रसिद्ध गायक श्री. हरेन्द्र चट्टोपाध्याय यांनीं हा रेकॉर्ड दिला असून एकदां ऐकल्यावर पुन्हां पुन्हां ऐकावासा तुम्हाला वाटेल. या रेकॉर्डकरितां श्री. हरेन्द्र चट्टोपाध्याय यांनीं मिराबाईकृत दोन भजनें निवडली आहेत. श्री. चट्टोपाध्याय यांजसारखा अर्थ समजून भजनें म्हणणारा कुशल गायक, मिराबाईकृत भजनें, आणि " हिज मास्टर्स व्हॉईसचें उत्कृष्ट रेकॉर्डिंग इतका संच जमल्यानंतर हा रेकॉर्ड लोकांच्या पसंतीला उतरला तर त्यांत नवल तें काय ?

एक बाजूः—तुम्हार कारण सब सुख छोडिया
अब मोहे क्यों तरसाओ ।
अब छाडिया नाहि बने प्रभुजी
तब चरण के पास बुलाओ
बिरह बिथा लागि ऊर अन्दर
सो तुम आये बुझाओ ।
मीरा दासी जनम जनम की
(प्रभुजी) तब अङ्गसु अङ्ग लगाओ
,, तव चित्रसू चित्र लगाओ

दुसरी बाजूः—मेरे जनम मरण के साथी तोहे नहि बिसरूं दिन राति
तुम देख बिन कल न पडत है, जानत मेरे साथी



उंचि चठ चठ पंथ निहारू, रोये रोये आंखिया राति ॥
मीरा के प्रभु परम मनोहर, हरि चरणाचित राति
पल पल तेरे रुप नेहारू, निरख निरख सुख पाति

## MYSORE PALACE INDIAN ORCHESTRA

### म्हैसुर पॅलेस इंडियन आरकेस्ट्रा

N 8929 { मोगी यानगे — झिंझोटी
८९२९ { हरी बोलो — मांड

नाविन्यपूर्ण रेकॉर्डस प्रसिद्ध करणें हें " हिज मास्टर्स व्हॉईस " कंपनीचें वैशिष्टय आहे या वैशिष्ट्याला अनुसरूनच आम्ही रेकॉर्डस प्रसिद्ध करीत असतों. या महिन्यामध्य आम्ही आजपर्यंत निघालेल्या रेकॉर्डपासून अगदीं भिन्न असा रेकॉर्ड ग्राहकांना नजर करीत आहों. हा रेकॉर्ड म्हणजे म्हैसूर पॅलेस इंडियन आर्केस्ट्राचा होय. वादन-रेकॉड अशी जरी याला संज्ञा दिलेली असली तरी गायनाचा त्यांत समावेश केला आहे. उच्च प्रतीचें निरनिराळ्या वाद्यांचें वादन व गायन यामुळें हा रेकॉर्ड बहुमोल आहेच पण शिवाय दुसऱ्या एका गोष्टीमुळें हा रेकॉर्ड लोकांच्या कौतुकांच व आनंदाचें स्थान होऊन बसेल कारण कीं म्हैसुर संस्थानच्या महाराजांच्या खास आकस्ट्राचें कौशल्य–ज्याचा अनुभव आतापर्यंत फारच मर्यादित लोकांनीं घेतला आहे–सर्वांना अनुभविण्यास मिळेल. या रेकॉर्डच्या एका बाजूवर ऑर्केस्ट्रा व प्रेमगीत असून दुसऱ्या बाजूवर ऑर्केस्ट्राची सुंदर साथ लाभलेलें ' हरी बोलों ' हें भजन आहे. रेकॉर्ड ऐकल्याशिवाय त्यांतील खरी गोडी तुम्हाला कळावयाची नाहीं म्हणून जरूर हा रेकॉर्ड एक वेळ ऐका अशी आमची तुम्हाला शिफारस आहे.

---

मागच्या तीन महिन्यांतील रेकॉर्डस्चे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



## ENGLISH RECORD — इंग्लीश रेकॉर्ड

इंग्लीश रेकॉर्डस सहसा आम्हीं आमच्या मराठी कॅटलॉगमध्यें देत नाहीं. आमच्या लोकांच्या पसंतीला पूर्णपणें उतरतील अशी खातरी वाटली तरच आम्ही इंग्लीश रेकॉर्डसची शिफारस करतों. या महिन्याला आम्हीं दोन इंग्लीश रेकॉर्डस-च्या टाय्टल्स व नंबर खालीं देत आहों. हे रेकॉर्डस तुम्हीं आपल्या डिलर्सकडे जरूर वाजवून पहावे अशी आमची सूचना आहे.

यापैकीं पहिला रेकॉर्ड बॅंडचा असून एकदां ऐकल्यावर तुम्हांला तो विकत घेऊन संग्रही ठेवावा असे वाटल्या खेरीज रहाणार नाहीं. बॅंडसचे रेकार्ड नेहमींच लोक-प्रिय असतात असा आमचा अनुभव आहे व विशेषतः मिलिटरी बॅंडसच्या रेकॉर्डना जास्त मागणी असते. खालीं दिलेला रेकॉर्ड मिलिटरी बॅंडचा असल्या-कारणानें तो तुम्हाला विशेष आवडेल अशी आमची खात्री आहे.

### The BAND of H. M. COLD STREAM GUARDS
### एच. एम. कोल्ड स्ट्रीम गार्ड बॅंड

B 8095 { स्टार्स व स्ट्राईप्स मार्च
{ ,, ,,

दुसरा रेकॉर्ड टेरेन्स कॅन्सीचा असून त्यांतील खरी गोडी रेकॉर्ड ऐकल्या-शिवाय कळणार नाहीं. एक वेळ जरूर हे दोन्ही रेकॉर्डस आपल्या डीलरकडे ऐका अशी पुन्हा एकदां आम्ही शिफारस करतो.

### TERENCE CASEY — टेरेन्स कॅसी

B 8207 { इन ए क्लॉक स्टोअर
{ ,, ए बर्ड ,,

या सप्लीमेंटमधील व आमच्या मेन कॅटलॉगमधील रेकॉर्डस मिळून आमच्या रेकॉर्डसचें संपूर्ण लिस्ट होतें.

# नागरी सप्लीमेन्ट

## नये  रेकॉर्ड

## हिंदुस्तानी गायनोके

१० और १२ इंची दोन्हो बाजुंके रेकॉर्ड

**Hindustani Records** हिंदुस्तानी रेकॉर्ड

**Pearu Quawal** प्यारु कव्वाल

P 10682 प्यारे पिया को मना लाओ सजनी भैरवी

१०६८२ पिया पिया पिया मत बोल बिहाग

अदा लुभाने के प्यारे तेरी ब्यान में है
किसी की आंख में जादू तेरा जबान में है

मुन्दजी बाला शेर का हकीकी और सही सब मफहूम पियारु कव्वाल के जेरे तसरोह रेकॉर्ड को सुनते ही रोशन हो जाता है हकीकत में यह अल्लाह की दैन है वरना कव्वाल तो हिन्दोस्तान भर में हजारों लाखों की तादाद में मोजूद हैं लेकिन जो बात पियारू का नसीब है वह किसी एक के भी हिस्से में नहीं आई मौसूफ का अन्दाज निराला तर्ज दिलकश और हुस्ने इन्तखाब इस कदर दिलावेज है कह सुभान अल्लाह इस पर रसाले साजों का साथ दिलों में चुटकियां लेता हैं अब रेकर्ड सुनकर हमारी सदाकत की दाद मरहमत फरमाईये.

गेल्या तीन महिन्यांतील रेकॉर्डस्‌चे लिस्ट या सप्लीमेंटच्या शेवटीं दिलें आहे.



एक बाजू:— प्यारे पिया को मना लाओ सजनी

खुदाके वास्ते मुझ पर करम तो फरमाओ
कह मेरी जान पे बन आई है तरस खाओ
घडी घडी मुझे यूं छेड कर न तडपाओ
प्यारे...............

बलाए शामे जुदाइ भी कोई मिलती है
हमेशा तेगं ही रह रह के दिल पे चलती है
बुझाए कौन बुझे क्या वह आग जलती है
प्यारे...............

सबब न पूछ उदासी का अश्के बहने लगा
सबक सिखाया कोई खमोश रहने का
सिवाए इसके नहीं और कुछ भीं कहने का
प्यारे.............

तडपता क्यों है दिले जार दमबदम अपना
बताए क्या तुझे नादां शरीके गम अपना
पियारे............

दुसरी बाजू:— पिया पिया पिया मत बोल पपीहरा

वह कज अदा सितम पेशा मस्ते नाज नहीं
वह दिलरुबा वह दिलारा वह दिल नवाज नहीं
मेरी तरफ नजरे चश्म नीम बाज नहीं
जिगर में दर्द मोहब्बत है चोरा साज नहीं
पिया............



